**शेतक-यांचे उत्पन्न दुप्पट करण्याच्या अनुषंगाने आवश्यक पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी विविध विभागातील महत्त्वाच्या सेवेशी निगडित पदभरतीस मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांक- संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२०/आ.पु.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-** शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२०/आ.पु.क., दि.१६.५.२०१८.

**प्रस्तावना :-**

शेतक-यांचे उत्पन्न दुप्पट करण्यासाठी त्यांना अत्यावश्यक नागरी सुविधा व ग्रामीण भागात आवश्यक त्या पायाभूत सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या दि.१६.५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये विविध विभागातील महत्त्वाच्या सेवेशी निगडित असलेल्या काही पदांच्या भरतीवरील निर्बंध उठविण्यात येवून जुन्या आकृतिबंधानुसार सदर पदांमधील सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेल्या पदांच्या १०० टक्के पदे भरण्यास मुभा देण्यात आली आहे. याच दृष्टीकोनातून आणखी काही विभागांतील पदांचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहेः

**शासन पुरकपत्र :-**

खालील तक्त्यामध्ये नमूद विभागनिहाय पदांचा वित्त विभागाच्या दि. १६.५.२०१८ च्या शासन निर्णयामध्ये समावेश करण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रशासकीय विभागाचे नाव | पदभरतीस मान्यता दिलेली पदे |
|---|---|---|
| १. | वन विभाग | १) सहायक वनसंरक्षक |
| | | २) वनक्षेत्रपाल |
| | | ३) वनरक्षक |
| | | ४) सर्व्हेक्षक |
| २. | महसूल विभाग | १) तलाठी |

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१८१२०६१४४१५७६४०५ असा आहे. हे पुरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shobha Shivaji Matre

Digitally signed by Shobha Shivaji Matre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7c2b54bb03aab87b854be497ae2dcd7039022071461b7eaf5d7d39d8d87de9fc, serialNumber=4b7476a486c93b80cc49bd393941b7ba3ad61480745d3cc64b30a72b4607d767, cn=Shobha Shivaji Matre
Date: 2018.12.06 14:49:12 +05'30'

**( शो. शि. मत्रे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद /विधानसभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा /विधान परिषद व संसद सदस्य.
३. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन मुंबई-३५
४. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
५. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
६. संबंधित मंत्रालयीन विभाग.
७. संबंधित मंत्रालयीन विभागाखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
८. वित्त विभागातील सर्व कार्यासने.
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१०. निवड नस्ती, वित्त विभाग (आ.पु.क.).